**आठव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत प्रकल्प उभारणीसाठी मान्यता देण्यात आलेल्या सहकारी सूत गिरण्यांची अर्थसहाय्यासाठी निवड करण्याबाबत - वसंतराव नाईक सहकारी सूतगिरणी मर्या, अकोला, जि. अकोला**

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
### शासन निर्णय क्रमांकः सूतगि-३३१६/प्र.क्र.५२/टेक्स-१ (अ)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय ( विस्तार), मुंबई ४०० ०३२.
तारीख : १९ एप्रिल, २०१७.

वाचा :-

१. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग,क्र. सूतगि-२३९३/१७१९/प्र.क्र.१८९/टेक्स-१, दिनांक २६.११.१९९३.
२. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग,क्र. सूतगि-२१९३/प्र.क्र.१८६/टेक्स-१, दिनांक ११.८.१९९३.
३. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्र. सूतगि- ११९७/प्र. क्र.१९३/टेक्स-१, दिनांक २४.३.१९९९.
४. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग,क्र. सूतगि-११२०००/प्र.क्र.१२१/टेक्स-१, दिनांक २४.११.२०००.
५. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्र. सूतगि-११०८/प्र.क्र.९१/टेक्स-१ (अ), दिनांक ३०.०६.२०११.
६. संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर यांचे पत्र क्र.कार्या.६ (१)/सूतगि/६२९२/२०१६, दि.२८.६.२०१६
७. संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर यांचे ज्ञापन क्र.कार्या.६ (४)/सूतगि/१४४२/२०१६, दिनांक ३.२.२०१६.

प्रस्तावना :-

आठव्या पंचवार्षिक योजनेच्या काळात महाराष्ट्रात नवीन सहकारी सूत गिरण्यांना मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, त्यास अनुसरुन वसंतराव नाईक सहकारी सूतगिरणी मर्या, अकोला, जि. अकोला या सूतगिरणीचा वाचा येथील अ.क्र.१, दि. २६.११.१९९३ च्या शासन निर्णयान्वये आठव्या पंचवार्षिक योजनेत समावेश करण्यास मान्यता देण्यात आली होती. याच काळात आठव्या पंचवार्षिक योजनेत समाविष्ट करण्यात आलेल्या बऱ्याचशा सहकारी सूत गिरण्यांनी उभारणीबाबत कार्यवाही सुरु करुन, प्रत्यक्ष उभारणी व उत्पादन सुरु केले. मागासवर्गीय सूतगिरण्या वगळता, उर्वरित ज्या सूत गिरण्यांनी प्रकल्प उभारणीबाबत काहीही कार्यवाही केली नाही, तसेच ज्यांना

शासनाकडून काहीही अर्थसहाय्य देण्यात आलेले नाही, अशा सूतगिरण्यांची शासनाच्या दि.२४.११.२००० च्या शासन निर्णयान्वये नोंदणी रद्द करण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार गिरणीने नोंदणी कालावधीपासून प्रकल्प उभारणीबाबत प्रगती न केल्याने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम १०२ अन्वये संचालनालयाचे दि. २०.११.२००१ चे आदेशानुसार गिरणी अवसायनात काढण्यात आली. सदर आदेशाविरुध्द गिरणीने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम १५४ अन्वये मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचेसमोर पुनर्निरिक्षण अर्ज क्र.६१/२०१४ दाखल केला. सदर अर्जावर मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांनी दि.१.८.२०१४ रोजी सुनावणी घेतली असून संचालनालयाचे दि. २०.११.२००१ रोजीचे आदेश रद्द करुन सूतगिरणीची नवीन वस्त्रोद्योग धोरणांतर्गत पुनरुज्जिवन करण्याबाबत कार्यवाही करुन आदेश निर्गमित करावेत, असे आदेश दि.२२.८.२०१४ रोजी पारीत केले आहेत. सदर आदेशानुसार गिरणीने प्रकल्प उभारणीसाठी जमीन खरेदीबाबत करार केलेला आहे. तसेच सूतगिरणीस वित्तीय संस्थेने कर्ज मंजूरीसाठी संमतीपत्र दिलेले आहे. सूतगिरणीने प्रकल्प उभारणीसाठी सुधारित प्रकल्प अहवाल तयार केला असून, तसेच इतर औपचारीक बाबीं पूर्ण केलेल्या असल्याने, सदरहू सूतगिरणीची शासकीय अर्थसहाय्यासाठी निवड करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

## शासन निर्णय :-

वसंतराव नाईक सहकारी सूतगिरणी मर्या, अकोला, जि. अकोला या सूतगिरणीची आठव्या पंचवार्षिक योजना काळात उभारणीसाठी निवड करण्यात आली होती. आता, सदरहू सूतगिरणीस शासकीय अर्थसहाय्य देण्यासाठी निवड करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर सूतगिरणीचे कार्यक्षेत्र पूर्वी अकोला व बुलढाणा हे होते, परंतु दि. ३.२.२०१६ रोजीच्या उपविधी दुरुस्तीनुसार सूतगिरणीचे कार्यक्षेत्र अकोला, बुलढाणा जिल्हे व जळगांव जिल्ह्यातील अमळनेर व पारोळा या तालुक्यामध्ये आहे. त्यानुसार प्रादेशिक उप संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर यांचे अध्यक्षतेखालील जागा निवड समितीने सूतगिरणीच्या जमिनीच्या जागेची पाहणी केली असून सूतगिरणीने मौजे नंदगांव, तालुका-अमळनेर, जिल्हा-जळगांव येथील मौजे नंदगांव ग्राम पंचायत हद्दीतील ६.७५ हे. आर. जमीन खरेदी करण्याबाबतचा करार केला आहे.

३. सहकार व वस्त्रोद्योग विभागाच्या दि. ११.८.१९९३ व दि. २४.३.१९९९ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती आणि सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या दि.३०.६.२०११ चा शासन निर्णय या सूतगिरणीवर बंधनकारक राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१९१६३५५५९३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishal Vishvas Madane

Digitally signed by Vishal Vishvas Madane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, cn=Vishal Vishvas Madane
Date: 2017.04.19 16:40:24 +05'30'

**( विशाल मदने )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२,
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
५. विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था, अमरावती / नाशिक,
६. प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, मुंबई / नागपूर,
७. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, अकोला / जळगांव,
८. जिल्हाधिकारी, अकोला / जळगांव,
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, मुंबई-२३,
१०.महालेखापाल, महाराष्ट्र१ / २, मुंबई / नागपूर,
११.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१२.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१३.अध्यक्ष, वसंतराव नाईक सहकारी सूतगिरणी मर्या, अकोला, जि. अकोला,
१४. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, वकील हाऊस, मुंबई,
१५. निवडनस्ती टेक्स १-अ / टेक्स १-ब).